मुख्यमंत्री ग्रामसडक योजना
पुणे जिल्हयातील सन २०१५-१६ व सन २०१६-१७ मध्ये निवडलेल्या रस्त्यांवरील पुलांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो-२०१८/प्र.क्र. १७३७/बांधकाम-४

बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: ११ जानेवारी,२०१९

**वाचा**

१) शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दि. २८.१०.२०१५
२) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. ग्रासयो-२०१५/प्र.क्र.८/पंरा-७, दि. ११.१२.२०१५
३) शासन पत्र ग्रामविकास विभाग क्र. मुग्रायो -२०१७/प्र. क्र.५४८/पंरा-७ , दि.२७.०९.२०१७
४) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे यांचे पत्र जा.क्र. मु.अ./प्रमंग्रासयो /Camp pune/६४९/१८, दि. ०८/१०/२०१८

## शासन निर्णय

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत पुणे जिल्हयातील सन २०१५-१६ व सन २०१६-१७ मध्ये निवडलेल्या रस्त्यांवरील पुलांच्या कामांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | रस्त्याचे नाव | पुलाची लांबी (मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्ती अंदाजीत रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | हवेली | PUN-९३ | रामा १३३ खामगांव मावळ ते मोगरवाडी रस्त्यावर सा.क्र.०/६०० मध्ये पुलाचे बांधकाम करणे. | ३६.०० | १८७.०४ | २.४२ |
| | | | एकुण | **३६.००** | **१८७.०४** | **२.४२** |

१. सदर कामे ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) , अधीक्षक अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) व कार्यकारी अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दि.२५.१०.२०१८ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार प्रत्येक पुलांच्या कामंना तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता तसेच अधीक्षक अभियंता (प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना) प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना यांनी पुलांचे बांधकाम करण्यासाठी ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरु करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी पुलाच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुनश्चः काटेकोरपणे तपासण्यात येवुन त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) आवश्यकतेनुसार ३० मी. पेक्षा जास्त लांबीच्या पुलांचे संकल्पनास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकल्प चित्र मंडळ (पुल) यांच्या मान्यतेनंतर सदर पुलाच्या कामास तांत्रिक मान्यता देण्यात यावी.

iii) सदर पुलांच्या कामासाठी लागणारी जमीन या विभागाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करुन घ्यावी. खाजगी जमीन अथवा वन विभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या पुलांची कामे हाती घेण्यात येवु नयेत, याबाबत पुनश्च खात्री करण्यात यावी.

iv) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे / जल विद्युत पाणीपुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करावी.

v) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी.

vi) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन / दर / दर पृथःकरण / रक्कम / दर पृथःकरणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vii) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वाव अन्य कोणत्याही योजनेत / कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही याची खातरजमा करावी.

viii) सदर कामांना सन २०१७-१८ च्या अद्ययावत दरसुचीनुसार तांत्रिक मंजूरी देण्यात यावी.

ix) सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

५. सदर कामावरील खर्च “मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१) , मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी - ५०५४ ५१५३” या शिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१११२०२०६५७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE

Digitally signed by RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, postalCode=400001, street=RURAL DEVELOPMENT DEPT,BANDHKAM BHAVAN,25MARZBAN ROAD,FORT,MUMBAI, serialNumber=d404eac17c41303f055a321c8b78aa06691d96f89d2b59532f46b0d468148ae1, ou=RURAL DEVELOPMENT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
Date: 2019.01.11 17:06:11 +05'30'

(र.आ.नागरगोजे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा / विधानपरिषद
२) जिल्हाधिकारी , पुणे

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , पुणे
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
५) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.वि.) मंत्रालय मुंबई ४०० ०३२
७) अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, पुणे
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
९) कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना,महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे
१०) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, पुणे
११) जिल्हा कोषागार अधिकारी ,पुणे
१२) श्री. एस.सी. मोने, वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना
१३) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य
१४) निवड नस्ती ( बांधकाम-४) ग्राम विकास विभाग.